**सप्टेंबर, २०२२ मध्ये राज्यातील विविध जिल्ह्यात अतिवृष्टीमुळे तसेच उद्भवलेल्या पूरपरिस्थितीमुळे झालेल्या नुकसानीसाठी बाधित शेतकऱ्यांना वाढीव दराने मदत देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२२/प्र.क्र.२९७/म-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २४ मार्च, २०२३.

<u>वाचा</u> :
१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०१५/प्र.क्र.४० /म-३, दि.१३.०५.२०१५
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. सीएलएस-२०२२/प्र.क्र.२५३/म-३,दि.२२.०८.२०२२
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग समक्रमांक दि.८.९.२०२२, दि.१४.०९.२०२२, दि.२८.०९.२०२२, दि.२.११.२०२२, दि.१७.११.२०२२, दि.२३.११.२०२२, दि.१५.१२.२०२२ व दि.११.०१.२०२३
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. सीएलएस-२०२२/प्र.क्र.२९९/म-३,दि.१३.१०.२०२२
५) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७(५)/नैआव्य./कावि-५४५/२०२२, दि.२५.११.२०२२.
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६७/म-११,दि.२४.०१.२०२३.

<u>प्रस्तावना</u>:

अतिवृष्टी, पूर व चक्रीवादळ या सारख्या नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्यास पुढील हंगामामध्ये उपयोगी पडावे याकरिता शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान (Input subsidy) स्वरूपात एका हंगामात एक वेळेस याप्रमाणे राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून विहित दराने मदत देण्यात येते. तसेच, राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या इतर मान्य बाबींकरिता देखील विहित दराने मदत देण्यात येते. राज्यात जुलै,२०२२ मध्ये झालेल्या अतिवृष्टी व पुरामुळे विविध जिल्ह्यात शेतीपिकांचे नुकसान झालेल्या बाधित शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान स्वरूपात मदत देण्याबाबत, तसेच इतर नुकसानीकरिता मदत देण्याबाबत दि.१०.०८.२०२२ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयास अनुसरुन, शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.२५३/म-३, दि.२२.०८.२०२२ अन्वये जून ते ऑक्टोबर, २०२२ या कालावधीतील अतिवृष्टी, पूर यासारख्या नैसर्गिक आपत्तीमुळे राज्यात विविध जिल्हयात होणाऱ्या शेतीपिकांच्या नुकसानीकरिता बाधित शेतकऱ्यांना खालीलप्रमाणे वाढीव दराने निविष्ठा अनुदान स्वरुपात मदत प्रदान करण्यास शासनाची मान्यता देण्यात आली आहे.

| अ.क्र. | बाब | प्रचलित दर | मदतीचे वाढीव दर |
|---|---|---|---|
| १. | जिरायत पिकांच्या नुकसानीसाठी | • रू.६८००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत | • रू.१३६००/- प्रति हेक्टर, ३ हेक्टरच्या मर्यादेत |
| २. | बागायत पिकांच्या नुकसानीसाठी | • रू.१३,५००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत | • रू.२७,०००/- प्रति हेक्टर, ३ हेक्टरच्या मर्यादेत |
| ३. | बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी मदत | • रू १८०००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत | • रू ३६,०००/- प्रति हेक्टर, ३ हेक्टरच्या मर्यादेत |

तसेच इतर नुकसानीकरीता शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.११.०८.२०२१ अन्वये ज्या बाबींकरिता वाढीव दराने मदत अनुज्ञेय करण्यात आली होती त्याच दराने या कालावधीसाठी मदत अनुज्ञेय करण्यात आली आहे. उर्वरित बाबींसाठी शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.१३.५.२०१५ अन्वये विहित करण्यात आलेल्या राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या दराने मदत अनुज्ञेय आहे.

जून ते ऑक्टोबर, २०२२ या कालावधीत झालेल्या अतिवृष्टीमुळे तसेच राज्यात विविध जिल्हयात उद्भवलेल्या पूरपरिस्थितीमुळे सार्वजनिक मालमत्ता/शेतीपिकांच्या नुकसानीसाठी संदर्भ क्र.१ व २ येथील दि.१३.०५.२०१५ व २२.८.२०२२ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेल्या दराने मदत देण्यासाठी आवश्यक असलेले निधी मागणीचे प्रस्ताव सर्व विभागीय आयुक्त यांच्याकडून प्राप्त झाले होते. त्यानुसार बाधित शेतकऱ्यांना शेतीपिकांचे नुकसान व शेतजमिनीचे नुकसान याकरिता मदतीचे वाटप करण्यासाठी एकूण **रु.७०९३.१९ कोटी** इतका निधी वर नमूद दि.८.९.२०२२, दि.१४.०९.२०२२, दि.२८.०९.२०२२, दि.२.११.२०२२, दि.१७.११.२०२२, दि.२३.११.२०२२, दि.१५.१२.२०२२ व दि.११.०१.२०२३ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

विभागीय आयुक्त्, नागपूर यांचेकडून सप्टेबर, २०२२ या महिन्यात अतिवृष्टीमुळे झालेल्या शेतीपिकाच्या व शेतजमिनीच्या नुकसानीसाठी दि.२५.११.२०२२ च्या पत्रान्वये रु.५८०६.०९ लक्ष इतक्या रकमेचा निधी मागणीचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

**<u>शासन निर्णय</u>**:

सप्टेंबर,२०२२ या कालावधीत राज्यात झालेल्या अतिवृष्टीमुळे व पूर परिस्थितीमुळे शेतीपिकांच्या व शेतजमिनीच्या नुकसानीसाठी बाधितांना मदत देण्याकरिता राज्य आपत्ती प्रतिसाद निधी व राज्य शासनाच्या निधीमधून संदर्भाधीन क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या दरानुसार शेतीपिकांच्या व शेतजमिनीच्या नुकसानीसाठी एकूण **रु.५८०६.०९ लक्ष** (अक्षरी रुपये अठ्ठावन कोटी सहा लक्ष नऊ हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रात लेखाशीर्षनिहाय दर्शविल्याप्रमाणे कार्यासन म-११ यांनी हा निधी वितरित करावा. जिल्हाधिकारी यांनी वर अनुक्रमांक ६ येथे नमूद दि.२४.०१.२०२३ अन्वये सूचित केल्यानुसार या प्रस्तावाअंतर्गत असलेल्या सर्व लाभार्थ्यांची माहिती विहित नमुन्यात तयार करुन ती संगणकीय प्रणालीवर भरावी. ही माहिती भरतांना -

अ) चालू हंगामामध्ये यापूर्वी सर्व विभागांना शेतीपिकांच्या नुकसानीकरिता वितरीत करण्यात आलेल्या मदतीच्या निधीमध्ये या प्रस्तांवातर्गंत मागणी करण्यात आलेल्या निधीचा समावेश नाही याची दक्षता घ्यावी.

ब) जून ते ऑक्टोबर, २०२२ या कालावधीत अतिवृष्टी व पूर यामुळे राज्यातील विविध जिल्ह्यात होणाऱ्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी वाढीव दराने मदत देण्याबाबत महसूल व वन विभाग, शासन निर्णय दि.२२.८.२०२२ नुसार जिरायत पिके, बागायत पिके व बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी मदतीचे दर अनुक्रमे रु.१३,६००/- , रु.२७,०००/- व रु.३६,०००/- प्रमाणे ३ हेक्टरच्या मर्यादेत असल्याची खातरजमा करण्यात यावी.

३. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन सर्व शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. संदर्भाधीन क्र.२ येथील दि.२२.०८.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मदतीचे वाढीव दर मंजूर करण्यात आले आहेत. त्या वाढीव दरापैकी **राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या (SDRF) संदर्भाधीन**

**क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयातील दराने** मदत प्रदान करण्यासाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या लेखाशीर्षाखाली वितरित करण्यात आलेला निधी खर्च करण्यात यावा आणि **वाढीव मंजूर दर वजा राज्य आपत्ती प्रतिसाद निधीचे दर यातील फरकाच्या मदतीच्या खर्चाची रक्कम** राज्य शासनाच्या निधीमधुन वितरित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा. ही मदत देताना केंद्र शासनाने चक्रीवादळ, पूर इत्यादी नैसर्गिक आपत्तीकरिता विहित केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याची खात्री सर्व संबंधितांनी करावी. तसेच राज्य शासनाने घोषित केलेल्या अतिवृष्टी या नैसर्गिक आपत्तीकरिता अतिवृष्टीच्या निकषानुसार मंडळामध्ये २४ तासात ६५ मि.मी.पेक्षा जास्त नोंद झालेली असल्यास आणि त्यामुळे मंडळातील गावामध्ये ३३ टक्केपेक्षा जास्त शेतीपिकांचे नुकसान झालेले असल्यास ही मदत अनुज्ञेय राहील. ही मदत देताना दि.८.०९.२०२२, दि.१४.०९.२०२२, दि.२८.०९.२०२२, दि.१३.१०.२०२२, दि.२.११.२०२२, दि.१७.११.२०२२, दि.२३.११.२०२२, दि.१५.१२.२०२२ व दि.११.०१.२०२३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी विचारात घेऊन व्दिरुक्ती होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४. **लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा**. या सर्व सूचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

५. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

६. वरील प्रयोजनासाठी प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी अंतर्गत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली पुरवणी मागणीव्दारे उपलब्ध केलेल्या निधीमधून खर्च करण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०३२४१७२४११०६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2023.03.28 18:09:50 +05'30'

**( संजय औ. धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई

३. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
४. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
५. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
६. विभागीय आयुक्त, नागपूर
७. सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
९. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१०. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
११. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१३. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१५. निवड नस्ती (कार्यासन/ म-३).

शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.२९७/म-३, दि.२४ मार्च, २०२३  सोबतचे प्रपत्र

## सटेंबर, २०२२ मध्ये शेतीपिकांच्या व शेत जमिनीच्या झालेल्या नुकसानीकरिता वितरित करावयाचा लेखाशिर्षनिहाय तपशिल

| अ. क्र. | जिल्हा | शेतकरी संख्या | शेतीपिकांचे बाधित क्षेत्र (२ हे.पर्यंत) | निधी | | शेतीपिकांचे बाधित क्षेत्र (२ हे. ते ३ हे.) | निधी | एकुण | | एकुण शेतीपिकांच्या नुकसानीकरिता वितरित निधी (२२४५ २४५२ +२२४५ २३०९) (रु.लाखात) | शेतजमिनीच्या नुकसानीकरिता वितरित निधी (२२४५ ०२९१) (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | २२४५ २४५२ | २२४५ २३०९ | | २२४५ २३०९ | शेतीपिकांचे बाधित क्षेत्र | निधी (२२४५ २३०९) (रु.लाखात) | | |
| १ | नागपूर | ४०९२३ | २०२९६.१० | २६९६.१३ | २६९६.१३ | ११०३.५० | ३८७.५१ | २१३९९.६० | ३०८३.६४ | ५७७९.७७ | १३.५ |
| २ | गडचिरोली | २०५ | ८३.२० | ६.४१ | ६.४१ | ०.०० | ०.०० | ८३.२० | ६.४१ | १२.८२ | ०.०० |
| **एकुण नागपूर** | | **४११२८** | **२०३७९.३०** | **२७०२.५४** | **२७०२.५४** | **११०३.५०** | **३८७.५१** | **२१४८२.८०** | **३०९०.०५** | **५७९२.५९** | **१३.५०** |